नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी राज्य व जिल्हा परिषद स्तरावरील कार्यालय स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सकआ-२०१४/प्र.क्र. २४७/आस्था-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक : १ सप्टेंबर, २०१४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजितक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य क्र.सकआ २००१/प्र.क्र.२५८/ आस्था-२, दि. २७/२/२००४
२) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र. प्राफेब ११०८/प्रक्र १६७/ठाणे/म-१०, दि. १७/६/२०१४
३) वित्त विभागाचे पृष्ठांकन क्र.पदनि-२०१४/प्रक्र ५४/१४/विसु-१, दि. ११/८/२०१४

**प्रस्तावना :-**

ठाणे जिल्हयाचे विभाजन करुन पालघर हा नवनिर्मित जिल्हा दि. १/८/२०१४ पासून अस्तीत्वात आला आहे. या नवनिर्मित पालघर जिल्हयात आवश्यक असलेली ५६ नविन कार्यालये स्थापन करण्यास मा.मंत्रीमंडळाने दि. १४/६/२०१४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील राज्य व जिल्हा परिषद स्तरावर कार्यालये स्थापन करणे व त्यासाठी आवश्यक असणारा कर्मचारी वर्ग उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने मंजूर करण्याची बाब विभागाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय: -

नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी सहायक आयुक्त, समाजकल्याण, पालघर व जिल्हा परिषद स्तरावरील जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर ही दोन कार्यालये स्थापन करण्यास शासन या निर्णयाव्दारे मंजुरी देत आहे. तसेच या दोन्ही कार्यालयासाठी खालीलप्रमाणे नवीन पदे मंजूर करण्यासही मान्यता देत आहे.

**सहायक आयुक्त, समाजकल्याण कार्यालय, पालघर -**

| अ.क्र | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदसंख्या | शेरा |
|---|---|---|---|---|
| १) | सहायक आयुक्त, समाजकल्याण, गट-अ | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ५०००/- | ०१ | |
| २) | समाजकल्याण अधिकारी, गट-ब | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४४००/- | ०१ | |
| ३) | कार्यालय अधिक्षक | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | ०१ | |

| अ.क्र | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदसंख्या | शेरा |
|---|---|---|---|---|
| ४) | सहायक लेखाधिकारी | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | ०१ | |
| ५) | समाजकल्याण निरिक्षक | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४२००/- | ०३ | ठाणे येथील सहायक आयुक्त, समाजकल्याण कार्यालय यांच्या आस्थापनेवरील ०५ पैकी ०३ पदे वर्ग करुन |
| ६) | लघुलेखक | --- | ०१ | बाहयस्त्रोताव्दारे |
| ७) | लिपिक | -- | ०१ | बाहयस्त्रोताव्दारे |
| ८) | वाहन चालक | -- | ०१ | बाहयस्त्रोताव्दारे |
| ९) | चतुर्थ श्रेणी कर्मचारी | -- | ०१ | बाहयस्त्रोताव्दारे |
| | | **एकुण :-** | **११** | |

**<u>जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर -</u>**

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदसंख्या | शेरा |
|---|---|---|---|---|
| १) | जिल्ह समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, गट-अ | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ५०००/- | ०१ | |
| २) | कार्यालय अधिक्षक /कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | ०१ | |
| २) | समाजकल्याण निरिक्षक | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४२००/- | ०५ | |
| ३) | सहायक लेखाधिकारी | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | ०१ | |
| ४) | वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | ०१ | |
| ५) | सहायक सल्लागार | रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४२००/- | ०१ | |
| ६) | वरिष्ठ लिपिक /सहायक | रु. ५२००-२०२००, ग्रेड पे २४००/- | ०२ | |
| ७) | लिपिक | --- | ०१ | बाहयस्त्रोताव्दारे |
| ८) | वाहन चालक | --- | ०१ | बाहयस्त्रोताव्दारे |
| ९) | चतुर्थश्रेणी कर्मचारी | --- | ०३ | बाहयस्त्रोताव्दारे |
| | | **एकुण :-** | **१७** | |

४. वरील दोन्ही कार्यालयातील ज्या पदांचे नावांसमोर बाहयस्त्रोताव्दारे असे दर्शविलेली आहे ती पदे बाहयस्त्रोताव्दारे भरण्यात यावीत. चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्याच्या कामाचे स्वरुप व जबाबदारी मल्टीटास्कींग (multitasking) स्वरुपाच्या असतील तसेच सदर पदांची कामे करुन घेताना त्याचे जॉबचार्ट निश्चित करुन त्यांना कामे ठरवुन द्यावीत. बाहयस्त्रोताव्दारे कामे करुन घेताना मल्टीटास्कींग घेण्याची क्षमता असणारा मनुष्यबळ मिळविण्याचा प्रयत्न करण्यात यावा. जेणेकरुन कमी मनुष्यबळाकडून जास्त काम करुन घेणे शक्य होईल.

५. लघुलेखक व लिपिक या पदांना मराठी व इंग्रजी दोन्ही भाषेतील अनुक्रमे श्रुत लेखनाचे / टंकलेखन व टंकलेखन तसेच संगणकाचे ज्ञान असणे आवश्यक राहील. या पदाची कामे प्रचलित नियमानुसार बाहय यंत्रणेकडुन करुन घेण्यात यावीत.

६. वरील सर्व पदे ही समाजकल्याण आयुक्तालय तसेच अपंगकल्याण आयुक्तालयाच्या संबंधित कायम संवर्गातील तात्पुरती भर म्हणुन समजण्यात यावीत. नियमित वेतनश्रेणीतील पदांवरील पदधारकांना शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय रहातील.

७. आयुक्त, समाजकल्याण व आयुक्त, अपंगकल्याण, पुणे यांनी त्यांचे आस्थापनेवरील वरील पदांवर तातडीने कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्याबाबत / पदभरतीबाबत कार्यवाही करावी.

८. वरील दोन्ही कार्यालये तातडीने कार्यान्वित करण्याबाबत आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी कार्यवाही करावी व तसा अहवाल शासनास सादर करावा.

९. यावर होणारा खर्च खालील मागणी क्र.एन-३, मुख्यलेखाशिर्षाखाली टाकावा व तो सन २०१४-१५ या वर्षात उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून भागवावा.

१) २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण
०१ अनुसूचित जातीचे कल्याण
००१ संचालन व प्रशासन
(०३)(०४) सामाजिक सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्ग शाखा) (विघयो)
(२२२५ ३४७६)

२) २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण
(०२) जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने
(०२)(०१) महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (स्थानिक क्षेत्र) (कोषागारातून देय) (२२२५ ०१३६)

३) २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण
(०२) जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने
(०२)(०२) जिल्हा परिषदांचे समाज कल्याण अधिकारी यांचे वेतन व भत्ते
(२२२५ डी ०५५)

४) २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण
०२- समाजकल्याण
१०१- अपंग कल्याण
महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने ( कोषागारातून देय)
०५- शारीरिक दृष्टया अपंगांसाठी इतर योजना
(०५)(२०) शारीरिक दृष्टया अपंग व्यक्तींना मार्गदर्शन करण्यासाठी कायदेविषयक सल्ला (कोषागारातून देय) (२२३५ २९५८)

१०. सदर शासन निर्णय हा मा.मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तर सचिव समितीने दि. २५/७/२०१४ व दि.७/८/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत देण्यात आलेल्या मंजुरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०२१२५१०८१४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Pandurang Wadte

Digitally signed by Kiran Pandurang Wadte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kiran Pandurang Wadte
Date: 2014.09.02 12:46:23 +05'30'

**(कि.पां.वडते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.राज्यपालांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मुख्यसचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मा.मंत्री (सा.न्याय), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९) मा.राज्यमंत्री (सा.न्याय), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) विभागीय आयुक्त, कोकण भवन, नवी मंबई
११) जिल्हाधिकारी, ठाणे

१२) जिल्हाधिकारी, पालघर
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे / पालघर
१४) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१५) आयुक्त, अपंगकल्याण, पुणे
१६) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
१७) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१८) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
१९) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई २०
२०) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
२१) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पालघर
२२) सर्व सहसचिव /उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) सर्व कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२४) निवडनस्ती आस्था २